भाप्रसे (संवर्ग) नियम, १९५४ मधील ४ (२) मधील परंतुकानुसार Apex Scale [Level 17 in the Pay Matrix] या संवर्गात दोन पदे तात्पुरत्या स्वरुपात निर्माण करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एईओ-१०१६/प्र.क्र.६८५ /२०१६/दहा,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
तारीख: **१५.०१.२०१९**

**प्रस्तावना-**

कार्मिक, सार्वजनिक गा-हाणी व निवृत्ती वेतन मंत्रालय (कार्मिक व प्रशिक्षण विभाग), भारत सरकार यांच्या दिनांक १५.०६.२०१८च्या अधिसूचने अन्वये, राज्यातील भारतीय प्रशासन सेवेतील संवर्ग पदांचे सुधारीत संख्याबळ निश्चित करण्यात आले आहे. त्यानुसार Apex Scale: Level 17 in the Pay Matrix या संवर्गात ८संवर्ग पदे मंजूर आहेत. तसेच भाप्रसे (वेतन) नियम २०१६ मधील नियम १२ (७) मधील तरतूदीनुसार आणखी ८ संवर्गबाहय पदे (SDR) भरता येतात. प्रशासकीय निकडीस्तव सदर संवर्गात तात्पुरत्या स्वरुपात दोन पदे निर्माण करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

भारतीय प्रशासन सेवा (संवर्ग) नियम, १९५४ मधील नियम ४(२) च्या दुस-या परंतुकाअन्वये Apex Scale: Level 17 in the Pay Matrix या संवर्गात दोन पदे तात्पुरत्या स्वरुपात दिनांक १५.०१.२०१९ पासून दिनांक ३१.०८.२०१९ पर्यंत निर्माण करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११४१५४८३४५८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sarita Rishi Bandekar Deshmukh

Digitally signed by Sarita Rishi Bandekar Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, serialNumber=e40a063b6b4e8f59f91f350aa6fec292a55db5bf8829c64d6c44e00a701cdaac, cn=Sarita Rishi Bandekar Deshmukh
Date: 2019.01.15 18:00:06 +05'30'

**(स.रि.बांदेकर-देशमुख)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग,
४. महालेखापाल, मुंबई/नागपूर,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवड नस्ती.